**तुरची, तासगांव (जिल्हा सांगली) येथे नवीन पोलीस प्रशिक्षण केंद्र सुरु करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्र.टीईएक्स-०३०८/प्र.क्र.४४२/पोल ५अ,**
**मंत्रालय, मुंबई ३२. दिनांक : ०६ एप्रिल, २०१०.**

**वाचा** : (१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-टिईएक्स-७३०६/प्र.क्र.६/पोल-५(अ), दि. २० सप्टेंबर, २००७.

(२) शासन निर्णय गृह विभाग,क्रमांक:अेपीओ-३१०८/६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दिनांक ७-८-२००८

(३) शासन निर्णय,गृह विभाग,क्रमांकः अेपीओ-३१०९/८३६/प्र.क्र.३४०/पोल-३, दिनांक ३१-१२-२००९.

(४) शासन निर्णय,गृह विभाग,क्रमांकः सीआरपी ०२०७/१७६०/प्र.क्र.४००/पोल-७, दिनांक १८ मार्च, २००८.

(५) शासन निर्णय,गृह विभाग,क्रमांकः संकीर्ण-०२०८/५२६/प्र.क्र.१६८/भाग-१/पोल-७, दिनांक ११ जुलै, २००८.

(६) शासन निर्णय,गृह विभाग,क्रमांक:पीएलएफ-०९०९/१६६६/प्र.क्र.६२८/पोल-४, दिनांक २६ ऑक्टोबर, २००९.

**शासन निर्णय :** शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-टिईएक्स-७३०६/प्र.क्र.६/पोल-५(अ), दिनांक-२० सप्टेंबर, २००७ नुसार तुरची-तासगांव (जिल्हा सांगली) येथे ५०० प्रशिक्षणार्थी इतकी क्षमता असलेले नवीन पोलीस प्रशिक्षण केंद्र सुरु करण्यास शासनाने तत्वतः मंजूरी दिली होती. पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळास सदर पोलीस प्रशिक्षण केंद्राच्या बांधकामासाठी रु.१७.४२ कोटी इतका निधी पोलीस दलाच्या आधुनिकीकरण योजनेतून व योजनांतर्गत योजनेतून उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर निधीतून तसेच पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकडील उपलब्ध निधीतून प्रशिक्षण विद्यालयाच्या इमारतीचे आतापर्यंत रु.२९.३६ कोटीचे बांधकाम पूर्ण झाले आहे. सदर प्रशिक्षण केंद्राच्या पूर्ण झालेल्या बांधकामाच्या व उर्वरित बांधकामकामासाठी मिळून अंदाजे रु.४६.४० कोटी इतक्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे. पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाने त्यांच्याकडील उपलब्ध करुन दिलेला निधी व प्रशिक्षण केंद्राच्या उर्वरित बांधकामासाठी आवश्यक तो निधी पोलीस दलाच्या आधुनिकीकरण योजनेतून व योजनांतर्गत योजनेतून उपलब्ध करुन घ्यावा.

या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" नुसार या प्रशिक्षण केंद्राच्या रु. २,३४,१२,७८०/- इतक्या खर्चाच्या साधन सामुग्री/प्रशिक्षण साहित्याच्या खरेदीच्या अंदाजपत्रकास शासन मान्यता देण्यात येत आहे. या मर्यादेच्या अधीन विहित कार्यपध्दती आणि नियमानुसार याबाबत खरेदी करणे बंधनकारक राहील. सदर खर्चासाठी आगामी विधी मंडळाच्या अधिवेशनात पूरक मागणीद्वारे तरतूद उपलब्ध होण्यासाठी विहित कालमर्यादेत प्रस्तास शासनाकडे पाठविण्यात यावा व पूरक मागणीद्वारे मंजूर होणाऱ्या उपलब्ध निधीतूनच हा खर्च भागविण्यात यावा.

२. शासन निर्णय गृह विभाग, क्रमांक:अेपीओ-३१०८/६९७/प्र.क्र.२८४/पोल-३, दिनांक-७-८-२००८ अन्वये कार्यकारी /लिपिकवर्गीय अधिकारी/कर्मचारी आणि वर्ग-४ चे कर्मचारी मिळून एकूण ६४ पदे निर्माण करण्यात आलेली आहेत. तसेच शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक:अेपीओ-३१०९/८३६/प्र.क्र.३४०/पोल-३, दिनांक ३१-१२-२००९ अन्वये सदर प्रशिक्षण केंद्राकरिता ११२ पदे निर्माण करण्यात आलेली आहेत. अशाप्रकारे सदर प्रशिक्षण केंद्रासाठी एकूण १७६ पदांची निर्मिती करण्यात आलेली आहे.

३. या केंद्राच्या **"प्राचार्य"** यांना **"कार्यालय प्रमुख"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच या केंद्राचे **"कार्यालयीन अधीक्षक (राजपत्रित)"** यांना या प्रशिक्षण केंद्राचे **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनोपचारिक संदर्भ क्र.१२०/व्यय-७, दिनांक.१०-३-२०१०अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(सदानंद जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रत :

प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर,
सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षक,
सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र,
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली,
कार्यासन-बीयुडी १, पोल-४, पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती-कार्यासन -पोल-५अ

## विवरणपत्र-अ

**प्रस्तावित पोलीस प्रशिक्षण विद्यालय, तासगाव करिता साधनसामुग्रीसाठी अपेक्षित खर्च**

| अ.क्र. | विषय | साहित्याचा तपशिल | एकूण किंमत |
|---|---|---|---|
| १ | पोलीस प्रशिक्षण विद्यालयाचे कार्यालयीन कामकाजासाठी | फर्निचर, संगणक, दूरध्वनी, फॅक्स मशीन इत्यादी. | रु.६,०५,०००/- |
| २ | प्रशिक्षणार्थींच्या वसतिगृहासाठी | टेबल, खुर्ची, लोखंडी कॉट इत्यादी. | रु.२२,०५,०००/- |
| ३ | प्रशिक्षणार्थींच्या मेससाठी | टेबल, खुची, मेस भांडी, शेगड्या इत्यादी. | रु.१४,८९,७५०/- |
| ४ | रापोनि व रापोउनि यांचे कार्यालयासाठी साधनसामुग्री | टेबल, खुर्ची, संगणक इत्यादी. | रु.१,३३,०००/- |
| ५ | इन डोअर करिता आवश्यक असलेली साधनसामुग्री | लोखंडी बेंचेस, कपाटे, जनरेटर, संगणक इत्यादी. | रु.३२,२४,०००/- |
| ६ | आऊट डोअर करिता आवश्यक असलेली साधनसामुग्री | बुलेटप्रुफ जाकेट, राहुटी, लाठी, नाईट व्हीजन गॉगल्स इत्यादी. | रु.४९,५३,५३०/- |
| ७ | वाचनालय | टेबल, खुर्च्या, कपाटे, पुस्तके इत्यादी. | रु.४,३२,०००/- |
| ८ | अध्यापक कक्ष | टेबल, खुर्च्या इत्यादी. | रु.२,१६,०००/- |
| ९ | भोजनालय भांडारगृह | कपाटे, भांडण्या, वॉटरफिल्टर/कुलर इत्यादी. | रु.१,६५,०००/- |
| १० | उपहारगृह | कपाटे, खुर्च्या, मेस टेबल इत्यादी. | रु.३,६४,०००/- |
| ११ | दवाखाना | खाटा, तपासणी टेबल, खुर्च्या इत्यादी. | रु.५०,५००/- |
| १२ | वाहने | इंडिगो कार (१), सुमो (२), जीप (३), पाच टनर लॉरी (२), वॉटर टॅंकर (१), लाईट व्हॅन (१), मोटार सायकल (५), स्कुल बस (१). | रु.४५,७५,०००/- |
| १३ | शस्त्रे व दारुगोळा | ए.के. ४७, ३०३ रायफल,९ एम.एम. कार्बाईन, ४१० मस्केट, ७.६२ रायफल व दारुगोळा इत्यादी. | रु.५०,००,०००/- |
| | एकूण | | रु.२,३४,१२,७८०/- |